जय गणेश

भगवान श्री एकदंत!!

भगवान श्रीगणेशांच्या अष्टविनायक अवतारांपैकी श्री मुदगल पुराणोक्त द्वितीयावतार आहे श्री एकदंत अवतार. ज्याप्रमाणे वक्रतुंड या शब्दाचा मराठी व्याकरणाच्या दृष्टीने अर्थ लागत नाही त्याच प्रमाणे एकदंत शब्दही मराठी अर्थनिर्धारण पद्धतीचा विषय नाही.

सामान्य अर्थाने कोणालाही विचारा की मोरयास एकदंत का म्हणतात? तर कोणीही चटकन सांगेल की मोरयाचा एका दात तुटला असल्याने त्यांना एकदंत म्हणतात. पण थोडा विचार करा. हा अर्थ खरेच बरोबर होईल कां? जर एक दात तुटला आहे तर मोरयास दीडदंत म्हणायला हवे नां? कारण एका दात पूर्ण आहे आणि दुसरा दात खंडीत आहे. म्हणजे तो अर्धा आहेच नां? मग दीड झाला की नाही? पण मोरयाचे नाव दीडदंत नाही तर एकदंतच आहे. मग काय आहे एकदंत चा अर्थ?

मुळात लक्षात घ्या की याचा बाह्य दंताशी काहीही संबंध नाही. असा दात तुटला असला तरी त्याचा एकदंतत्वाशी संबंध नाही. कारण असा हा दात का तुटला हे सांगणा-या तब्बल पाच कथा सापडतात. मग जर पहिल्याच कथेत तुटला तर दुस-यावेळी कुठून आला? अर्थात त्या कथांचाही वेगळाच अर्थ असणारच. मग काय आहे एकदंतत्व?

श्री मुदगल पुराणकारांनी एकदंतत्वाची उकल केली आहे. "एका" हा शब्द मायेसाठी योजिला जातो. तीनही गुणांची जी साम्यावस्था त्या एक अवस्थेला मुळमाया म्हणतात. अशा या मूळ प्रकृतीला आदिमायेला एका असे म्हणतात.

त्याच प्रमाणे दन्त या संस्कृत शब्दाचा अर्थ 'सत्ता' असा आहे. दन्त: सत्तात्मको धातू:! असा नियम आहे. अर्थात एका म्हणजे माया आणि दन्त म्हणजे सत्ता. या दृष्टीने त्या 'एका' अशा मायेवर ज्यांची दन्त अर्थात सत्ता चालते त्या मायासंचालक परब्रह्मास एकदंत म्हणतात. हा श्री एकदंत अवतार मदासुर नामक राक्षसाच्या परीपत्यार्थ होत असतो. ही सगळी रचनाच मोठी चिंतनीय आहे. मदासुर विनाशक एकदंतत्वच द्वितीय खंडाचा चिंतन विषय आहे.

मदासुर प्रगट झाला देवराज इंद्र आणि च्यवन महर्षींच्या संग्रामात. या दोघांच्या मदपुर्णतेतून आला तो असुर झाला मदासुर. मद म्हणजे काय? तर माझ्या जवळ असणारी शक्ती ही माझीच शक्ती आहे असे वाटल्याने येणारी उन्मत्तता म्हणजे मद.

देवराज इंद्र यज्ञस्थळी येतात आणि अश्विनीकुमारांना हविर्भाग देण्यास नकार देतात. मी देवराज आहे. मी म्हणेल तसेच होणार. माझीच सत्ता या जगावर चालते या 'मदात' ते आले. हा देवराजांचा मद आहे.या मदाला टकरला च्यवनांचा मद. तू असशील देवराज. मी काय कमी आहे कां? मी माझ्या तपस्येने संपन्न आहे. त्या अधिकाराने मी मला हवा तो बदल घडवून आणू शकतो. हा महर्षी च्यवनांचा मद आहे.

एक सत्तामद आहे तर दुसरा तपस्यामद आहे. काय विचित्र रचना आहे ही! सत्ता सेवेचे साधन हवी तर तपस्या शांतीचे. पण दोन्हींचा परिणाम मात्र मदात झाला आहे किती विचित्र आहे हे. जर सत्ताधीश आणि तपस्यापुतही जर मदोन्मत्त झाले तर मग सामान्यांची काय दशा. ते वाचणार कसे? आणि मग त्यांना वाचणार तरी कोण?

या सत्ता वा तप ही सामान्य नाहीत. एक देवराज आहेत तर दुसरे ऋषिराज. पण तेही मदातून सुटत नाहीत. मग सामान्यांचे काय? कदाचित उलटच घडत असावे. सत्ता व तप जितके जास्त तितका मद मोठा. म्हणूनच हे दोन 'मद' भिडतात आणि मग त्या एकत्रीकरणातून, परस्परांवर कुरघोडी करण्याच्या नादात त्रैलोक्याला  त्रस्त करणारा मदासुर प्रगटतो.

मदासुर शक्तीचे आराधन करतो. बरोबरच आहे. मदाला फुलविण्यासाठी मदग्रस्त जीव आपली शक्ती वाढवतच राहतो. सत्ताधारी सत्तास्तर वाढवतो. तपस्याधारी तपस्येची कठोरता वाढवतो. मदासुराची मागणी आहे. 'पंच महाभूतात्मक कशानेही मृत्यू नसावा.'

खरच आहे पंचमहाभूतात्मका पैकी कशानेही मद संपतच नाही. उलट या सगळयांनी निर्मित बाबींनीच तो वाढत जातो. बलशाली होत असतो. कथेतही नेमके हेच होत राहते.मद बलशाली होतो. त्रैलोक्य विजयी होतो. देवता वनवासी झाल्या. इंद्राचीच काय विष्णूशंकरादिकांचीही सत्ता अंतिम नाही हे सांगत देवता परब्रह्म गणनाथांची करुणा भाकू लागल्या.

यावेळी देवतांच्या अनुष्ठानाचे आधार झाले श्री सनकादिक महर्षी. मागच्या वेळी देवतांना उपदेश दिला होता. मग आता पुन्हा कां? तर भगवान प्रगट होतात.राक्षसनिर्दालन करतात. देवतांना पुनरपि पदस्थ करतात. मात्र पद मिळाले की देणा-याचा विसर पडतो सत्ता मिळाली ती आपल्या पात्रतेने, योग्यतेने या वृत्तीतूनच मग 'मद' बोकाळतो. तो पुनश्च पदच्युत करतो. मग डोळे उघडतात. श्री गणराज चरणी शरणागती स्वीकारली जाते.

मद जाणार कुठे? संपणार कुठे? तर श्री एकदंत चरणीच. कारण त्यांची 'एकटयाटीच सत्ता' आहे हे कळले की आपल्या सत्तेचा वाटणारा मद गळून जातो. हे मदगलीतत्वच आहे एकदंतोपासना.

मोरयाच्या या एकदंतत्वात आणखी एक वेगळाच सुंदर अर्थ आहे. मोरयाचा एक दात खंडित आहे. पण कोणता? डावा की उजवा? आपण हा विचारच करीत नाही. मूर्तीकाराला वाटेल तो तोडतो. चित्रकाराला वाटेल ते खोडतो. पण असे चालत नाही. शास्त्रात नेमका कोणता खंडित हवा याचे स्पष्ट कथन आहे.

श्रीगणेश सहस्रनामात मोरयाची दोन नावे आहेत. भग्नवामरद आणि तुंगसव्यदंत अर्थात डावा दात तुटला आहे. उजवा पूर्ण आहे. पण डावाच कां? तर तो गृहपाठ. करा विचार. म्हणजे चतुर्थी मोरयाच्या चिंतनात जाईल. नाहीच सापडले तर नंतर कधीतरी सांगूच. तो पर्यंत,
'श्री एकदंताय नम:' जय गणेश!

अधिक माहिती करता संपर्क
स्वानंदशास्त्री गजानन पुंड
ईमेल:sgpund@rediffmail.com
For More Details Visit Our Website:www.dagdushethganpati.com